शासकीय वाहन चालकांना देण्यात येणा-या अतिकालिक भत्त्याबाबत खुलासा.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक: अकाभ-1395/17/सेवा-9,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 9 नोव्हेंबर, 1995.

## शासन परिपत्रक

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: अकाभ-1393/प्र.क्र.109/सेवा-9, दिनांक 29 मार्च, 1995 नुसार शासकीय वाहनचालकांना सुधारित दराने अतिकालिक भत्ता मंजूर करण्यात आला आहे. सदर आदेशाची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने काही मुद्दयांबाबत शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अकाभ-1395/17/सेवा-9, दिनांक 26 जुलै, 1995 अन्वये सविस्तर खुलासा करण्यात आला होता. तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, वाहन चालकांना अतिकालिक भत्ता मंजूर करण्याबाबत प्रस्तुत शासन परिपत्रकातील खुलाशाचा काही कार्यालयांनी वेगवेगळा अर्थ लावल्यामुळे अतिकालिक भत्ता मिळण्यात अडचणी निर्माण झाल्या आहेत.

शासन याबाबत पुन: असा खुलासा करीत आहे की, अतिकालिक भत्त्याची परिगणना करण्याकरिता वाहन चालक ज्यावेळी कामावर हजर होतो आणि त्यावेळेपासून नऊ तासांपर्यन्तचा कालावधी कार्यालयीन वेळ म्हणून विचारात घेण्यात यावा. वाहन चालकांना अतिकालिक भत्ता निश्चित करण्यासाठी सदरहू वाहनचालकाच्या लॉग बुकातील वेळेच्या नोंदी ग्राह्य धरण्यात येत असल्यामुळे लॉगबुकातील गाडी सुरू केल्याची व बंद केल्याची जी वेळ नोंदविण्यात आली असेल तो कालावधी हा गाडी चालविल्याचा कालावधी म्हणून समजण्यात यावा व त्यानुसार अतिकालिक भत्त्याची देयके तयार करण्यात यावीत.

शासन पुढे असाही आदेश देत आहे की, अतिकालिक भत्ता व दैनिकभत्ता या दोन स्वतंत्र बाबी असल्यामुळे वाहन चालक दौ-यावर असताना, अतिकालिक भत्त्याची परिगणना करण्यासाठी नऊ तासांच्या विहित कर्तव्य कालावधी नंतर प्रत्यक्ष गाडी चालविण्याचे काम वाहन चालकाने केले असल्यास त्याला अतिकालिक भत्ता देण्यात यावा ही जी अट घालण्यात आली आहे ती रद्द करण्यात येत आहे. मुख्यालयात असताना रविवार किंवा सुट्टीच्या दिवशी वाहन चालकाने गाडी चालविल्यास ज्या पध्दतीने अतिकालिक भत्ता अनुज्ञेय ठरतो त्याप्रमाणे दौ-यावरही लॉगबुकातील नोंदीनुसार अतिकालिक भत्त्याची परिगणना करण्यात यावी. अतिकालिक भत्ता हा अनुज्ञेय... दैनंदिन भत्त्याव्यतिरिक्त राहील.

हे आदेश दिनांक 1 [illegible] 1995 पासून अंमलात येतील. यापूर्वी जी प्रकरणे अंतिमतः निकालात काढण्यात आलेली आहेत ती पुन्हा उघडण्यात येऊ नयेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शरद बसनाक,
शासनाचे अवर सचिव.

(कृ.मा.प.)